**मौजे. जांबुटके, ता. दिंडोरी, जि. नाशिक येथे उभारावयाच्या आदिवासी औद्योगिक समूह प्रकल्पास आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मंजूर निधीच्या खर्चाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**

**शासन निर्णय क्र. संकीर्ण- २०२२/ प्र.क्र.४१ अ/ उद्योग-७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक २१/०३/२०२५

**वाचा** :- १) मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २७/०१/२०२२ व दिनांक ०७/१२/२०२२ रोजी संपन्न बैठकांचे इतिवृत्त.

२) महाराष्ट्र विधानसभा नियम २६४(५) नुसार डिसेंबर, २०२२ च्या हिवाळी अधिवेशनात पुरवणी विधेयकावरील चर्चेदरम्यान मा. विधानसभा सदस्यांनी उपस्थित केलेल्या मुद्द्यांच्या अनुषंगाने केलेल्या कार्यवाहीचा आढावा घेण्यासाठी मा. उप मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखालील दिनांक २१/०३/२०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

३) उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.४१अ/उद्योग-७, दिनांक १६/१०/२०२३.

४)आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. बीयुडी-२०२४/प्र.क्र.९/कार्यासन-६, दिनांक ०६/०२/२०२५.

**प्रस्तावना** :-

मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २७/०१/२०२२ व दिनांक ०७/१२/२०२२ रोजी संपन्न बैठकीमध्ये महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने मौजे. जांबुटके, ता. दिंडोरी, जि. नाशिक येथे आदिवासी औद्योगिक समूह उभारणी करणेसंदर्भातचा प्रकल्प प्रस्ताव तयार करून त्याबाबतची निधी मागणी उद्योग विभागामार्फत आदिवासी विकास विभागाकडे करावी व आदिवासी विकास विभागाने त्याकरीता आवश्यक निधी अर्थसंकल्पित करून उद्योग विभागास उपलब्ध करून देण्यात यावा, असा निर्णय झाला.

**२.** महाराष्ट्र विधानसभा नियम २६४(५) नुसार डिसेंबर, २०२२ च्या हिवाळी अधिवेशनात पुरवणी विधेयकावरील चर्चेदरम्यान मा. विधानसभा सदस्यांनी उपस्थित केलेल्या मुद्द्यांच्या अनुषंगाने केलेल्या कार्यवाहीचा आढावा घेण्यासाठी मा. उप मुख्यमंत्री तथा मा. मंत्री (वित्त) यांच्या अध्यक्षतेखालील दिनांक २१/०३/२०२३ रोजी आढावा बैठक संपन्न झाली. सदर बैठकीमध्ये मौजे. जांबुटके, ता. दिंडोरी, जि. नाशिक येथे उभारावयाच्या आदिवासी औद्योगिक समूह प्रकल्पाच्या अनुषंगाने उद्योग विभागाने प्रशासकीय मान्यता प्रदान करावी, तसेच आदिवासी विकास विभागाने या प्रयोजनासाठी निधी उपलब्ध करून देण्याची कार्यवाही करावी, असे निर्देश देण्यात आले.

**३.** महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या दिनांक १७/०७/२०२३ रोजीच्या प्रस्तावानुसार, मौजे. जांबुटके, ता. दिंडोरी, जि. नाशिक येथील ३१.५१ हे.आर क्षेत्रावर आदिवासी औद्योगिक समूह उभारणे या प्रकल्पाकरीता रुपये १२०,१७,३२,६००/- (ठोक) रकमेच्या कामांना, आदिवासी विकास विभागाकडून एकाच वेळी (प्रकल्पाच्या सर्व टप्प्यांना अनुसरुन) रुपये ५० कोटी निधी उद्योग विभागास उपलब्ध होण्याच्या अधीन राहून, दिनांक १६/१०/२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली. त्यानुसार सदर प्रकल्पाकरीता महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ हे विशेष नियोजन प्राधिकरण (SPA) व कार्यान्वयन यंत्रणा (IA) राहणार आहे.

**४.** मौजे. जांबुटके, ता. दिंडोरी, जि. नाशिक येथील आदिवासी औद्योगिक समूह प्रकल्पाकरीता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत 'महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ यांस सहाय्य (२४२५ ०८५३)' या योजनेतून प्रकल्प किंमतीपैकी एकवेळ (प्रकल्पाच्या सर्व टप्प्यांना अनुसरून) रुपये ५० कोटी इतका निधी वितरीत व खर्च करण्यास दिनांक ०६/०२/२०२५ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. तसेच सदर निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, उद्योग विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आलेला आहे.

**५.** वरील वस्तुस्थिती लक्षात घेता, मौजे. जांबुटके, ता. दिंडोरी, जि. नाशिक येथे आदिवासी औद्योगिक समूह प्रकल्पाची उभारणी करणे प्रयोजनार्थ आदिवासी विकास विभागाकडून दिनांक ०६/०२/२०२५ रोजीच्या शासन निर्णयान्वये सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरणाकरीता उपलब्ध करुन दिलेले रुपये ५० कोटी इतके अनुदान विशेष नियोजन प्राधिकरण (SPA) व कार्यान्वयन यंत्रणा (IA) म्हणून महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडे वर्ग करून सदर अनुदानाच्या खर्चास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>** :-

मौजे. जांबुटके, ता. दिंडोरी, जि. नाशिक येथे आदिवासी औद्योगिक समूह प्रकल्पाची उभारणी करणे प्रयोजनार्थ आदिवासी विकास विभागाकडून दिनांक ०६/०२/२०२५ रोजीच्या शासन निर्णयान्वये मौजे. जांबुटके, ता. दिंडोरी, जि. नाशिक येथे आदिवासी औद्योगिक समूह प्रकल्पाची उभारणी करण्याकरीता प्रकल्प किमतीपैकी एकवेळ (प्रकल्पाच्या सर्व टप्प्यांना अनुसरून) रुपये ५०,००,००,०००/- (अक्षरी रुपये पन्नास कोटी फक्त) इतका निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता दिली आहे. त्यानुसार आदिवासी विकास विभागाकडून सदर निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, उद्योग विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत केलेला आहे. त्याअनुषंगाने सदर प्रयोजनार्थ रुपये ५०,००,००,०००/- (अक्षरी रुपये पन्नास कोटी फक्त) इतके अनुदान विशेष नियोजन प्राधिकरण (SPA) व कार्यान्वयन यंत्रणा (IA) म्हणून महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडे वर्ग करून सदर अनुदानाच्या खर्चास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

**२.** सदर रुपये ५०,००,००,०००/- इतकी अनुदानाची रक्कम खर्च करण्यासंदर्भात उप सचिव (उद्योग-७), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग हे नियंत्रक अधिकारी असतील. तसेच सदर अनुदानाची रक्कम आहरण व संवितरणाची जबाबदारी ही विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांची राहील.

**३.** विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांच्याकडून अनुदानाची सदर रक्कम आहरीत करून महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ या यंत्रणेकडे सुपूर्द करण्यात येईल.

**४.** अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांच्याकडून अनुदानाच्या सदर रकमेचा धनादेश "मुख्य अभियंता (मुख्यालय), महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई" यांचे नावे काढून त्यांना अदा करण्यात येईल.

**५.** सदर निधी तसेच सदर निधीवर जमा होणा-या व्याजाचा विनियोग हा मौजे. जांबुटके, ता. दिंडोरी, जि. नाशिक येथील आदिवासी औद्योगिक समूह प्रकल्पावरच करण्याची दक्षता मुख्य अभियंता (मुख्यालय), महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई यांच्याकडून घेण्यात येईल.

**६.** प्रस्तुत प्रयोजनार्थ होणारा खर्च हा "मागणी क्र.टी-५, २४२५-सहकार, ००, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१)(०८) महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळाला वित्तीय सहाय्य (कार्यक्रम)(२४२५ ०८५३), ३१- सहायक अनुदाने(वेतनेतर)" या लेखाशिर्षाखालील सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात येईल. तसेच सदर प्रयोजनार्थ होणारा प्रत्यक्ष खर्च निधी वितरणाच्या अधीन राहून करण्याची दक्षता घेण्यात येईल.

**७.** सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या ई-ऑफीस फाईल क्र. MTD-२४०२१/३/२०२५-MTD(Desk-३)-Tribal Development वर दिनांक १५/०१/२०२५ रोजी दर्शविलेल्या सहमतीस अनुसरून तसेच आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२४/प्र.क्र.९/कार्यासन-६, दिनांक ०६/०२/२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**८.** सदर शासन निर्णय प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून सचिव (उद्योग) यांना दिनांक २४/०७/२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

**९.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आले असून त्याचा सांकेतांक क्र. २०२५०३२११५४३१३६०१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by AJIT TUKARAM SASULKAR
Date: 2025.03.21 17:10:28 +05'30'

**(अजित सासुलकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२) सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई-९३.
४) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई-३२.
५) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण), मुंबई/ नागपूर.
६) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखा परीक्षण अधिकारी, मुंबई.
८) मुख्य अभियंता (मुख्यालय), महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई-९३.
९) मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई-९३.
१०) वित्त विभाग (कार्यासन अर्थसंकल्प-१४/ व्यय-१६), मंत्रालय, मुंबई-३२.
११) नियोजन विभाग (कार्यासन-१४६१), मंत्रालय, मुंबई-३२.
१२) अवर सचिव (का-०३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३) कक्ष अधिकारी (प्रशासन-१), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१४) निवडनस्ती (उद्योग-७).